**श्री क्षेत्र औंढा (नागनाथ),जि. हिंगोली तीर्थक्षेत्र विकास आराखड्यासाठी लेखाशिर्षास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.९९/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २१ जून, २०२४.

**वाचा:** १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.९९/का.१४४४-अ, दिनांक ३०/११/२०२३.
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.३४/का.१४४४-अ, दिनांक १२/०३/२०२४

**प्रस्तावना:**

नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.९९/का.१४४४-अ, दिनांक ३०/११/२०२३ अन्वये "श्री. क्षेत्र औंढा (नागनाथ),जि. हिंगोली तीर्थक्षेत्र विकासाच्या रुपये १५.२१ कोटी किंमतीच्या आराखड्यास" प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. हा आराखडा सन २०२३-२४ पासून अंमलात येत आहे. सदर आराखड्यांतर्गत करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यात येत आहे. तसेच वित्तीय तरतूद व लेखाशीर्ष याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे उक्त शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आले आहे.

२. दरम्यान यापुढे प्रत्येक आराखड्याकरीता स्वतंत्र महसुली व भांडवली लेखाशिर्ष न घेता सर्व आराखड्यांसाठी एक महसुली व भांडवली लेखाशिर्ष करण्याचे धोरण शासनस्तरावरुन निश्चित करण्यात आले असल्यामुळे यापुढे नियोजन विभागामार्फत प्रशासकीय मान्यता देण्यात येणाऱ्या तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखड्यांसाठी उपरोक्त वाचा येथील क्र.२ अन्वये नवीन लेखाशीर्षास मंजूरी देण्यात आली आहे.

३. आता उक्त क्र. १ व २ च्या अनुषंगाने "श्री. क्षेत्र औंढा (नागनाथ),जि. हिंगोली तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत" करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च भागविण्यासाठी लेखाशीर्षास मंजूरी देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"श्री क्षेत्र औंढा (नागनाथ),जि. हिंगोली तिर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत" करण्यात येणाऱ्या कामांवर होणारा खर्च, नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.३४/का.१४४४-अ, दिनांक १२/०३/२०२४ अन्वये मंजूरी देण्यात आलेल्या खाली नमूद लेखाशीर्षातून भागविण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

भांडवली खर्चासाठी लेखाशीर्ष :

| मागणी क्र. ओ-१० (भांडवली खर्च) | | | |
|---|---|---|---|
| ५४५२, | पर्यटनावरील भांडवली खर्च | 5452 | Capital outlay on Tourism |
| ०१, | पर्यटनासाठी पायाभूत सुविधा | 01 | Tourist Infrastructure |
| १०१ | पर्यटन केंद्र | 101 | Tourist Centres |
| ०० | | 00 | |
| (००) (१५) | "तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा" (कार्यक्रम/दत्तमत) (५४५२०२११) | (००)(15) | "Pilgrimage And Tourism Destination Development Plan" (Scheme/Voted) (54520211) |

महसूली खर्चासाठी लेखाशीर्ष :

| मागणी क्र. ओ-८ | | Demand No.O-८ | |
|---|---|---|---|
| ३४५२ | पर्यटन | 3452 | Tourism |
| ०१ | पर्यटनासाठी पायाभूत सुविधा | 01 | Tourist Infrastructure |
| १०१ | पर्यटन केंद्र | 101 | Tourist Centres |
| ०० | | 00 | |
| (००) (१६) | "तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा" (कार्यक्रम/दत्तमत) ( ३४५२३०६६) | (00)(16) | "Pilgrimage And Tourism Destination Development Plan" (Scheme/Voted) ( 34523066) |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२११४२८१११४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKUMAR
GANGARAM
RAUT

Digitally signed by NANDKUMAR GANGARAM RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2364c4585e9e2f4e1a3eb4e4ad8e29fd11241a0ac1929b933f28fc39d2906d11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EFAB5769910D3540376EC2062B6C2A6B1BD6E7BC121FF37D75E24F4318761C66, cn=NANDKUMAR GANGARAM RAUT
Date: 2024.06.21 14:41:51 +05'30'

**( नंदकुमार राऊत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१,मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीमहाराज नगर
५. जिल्हाधिकारी, हिंगोली
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली
७. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
८. जिल्हा नियोजन अधिकारी, हिंगोली
९. कार्यासन व्यय-८/अर्थ-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती.